


<u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती व पदस्थापना</u>

**श्री. गजेंद्र मालठाणे, उपमुख्य अधिकारी, गृहनिर्माण, क्षेत्र विकास प्राधिकरण, अमरावती तथा तहसीलदार**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्थाप्र २०२४ / प्र. क्र. ९८/ आस्था २**
मंत्रालय विस्तार, पहिला मजला,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांकः- २५ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भः**
१. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०११ / प्र. क्र. १३७ / कार्या.१२, दि.१७/१२/२०१६
२. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. ५१० / कार्या.१२, दि.१६ फेब्रुवारी, २०१८
३. शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना - २, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२
४. प्रादेशिक उपसंचालक, इ.मा.ब.क. (प्रादेशिक) विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. प्राउसंइमाबकप्रावि / अम / आस्था /श्री. मालठाणे स.स. अधि /रूजू अहवाल / २२३२ / २०२४-२५, दि.२६.१२.२०२४
५. या विभागाचा समक्रमांकाचा शासन आदेश दि.४/१०/ २०२४

**शासन निर्णयः-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्रमांक १ व २ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांच्या अधीन राहून संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये श्री. गजेंद्र मालठाणे, उपमुख्य अधिकारी, गृहनिर्माण, क्षेत्र विकास प्राधिकरण, अमरावती तथा तहसीलदार यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अमरावती येथील सहायक संचालकांच्या जिल्हा कार्यालयात सहायक संचालक या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र. ४ येथील पत्रामध्ये नमूद केल्यानुसार श्री. गजेंद्र मालठाणे, उपमुख्य अधिकारी, गृहनिर्माण, क्षेत्र विकास प्राधिकरण, अमरावती तथा तहसीलदार हे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, अमरावती या पदावर दि. १२.१२.२०२४ (म.पू.) रोजी रूजू झाले असून त्यांची वेतनश्रेणी एस-१९, (₹५५,१०० - ₹१३२,३००) आहे. तसेच संदर्भ क्रमांक ३ येथील दि. २२ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार सहायक संचालक या पदाची वेतनश्रेणी एस १८, ₹४९,१०० - ₹१५५,८०० अशी आहे.

३. श्री. गजेंद्र मालठाणे, उपमुख्य अधिकारी, हे सहायक संचालक, इ.मा.ब.क., अमरावती या पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असण्याच्या कालावधीत सहायक संचालक या एका पदाची वेतनश्रेणी एस १८, (₹४९,१०० - ₹१५५,८००) वरून उन्नत करून एस-१९, (₹५५,१०० - ₹१३२,३००) अशी करण्यास याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे. श्रेणी उन्नत केलेले उपरोक्त सहायक

संचालक हे पद श्री.गजेंद्र मालठाणे हे सहायक संचालक या पदावर कार्यरत असेपर्यंतच राहील, त्यानंतर ते पद आपोआप मूळ वेतनश्रेणीत, म्हणजे एस १८, ₹४९,१०० - ₹१५५,८०० या वेतनश्रेणीत श्रेणी अवनत होईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०/सेवा-९, दि.०५.०२.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२५१६०६००४४३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.02.25 16:06:55 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. गजेंद्र मालठाणे, सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन,चांदूर रेल्वे रोड, अमरावती

**प्रत,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
२. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, (प्रादेशिक) डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन, पोलीस आयुक्तालयाचे मागे, अमरावती
३. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, अमरावती
४. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव, (सेवा ९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९. मा. मंत्री ( इ.मा.ब.क. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव ( इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती.